# Netअक्षरी

ई-साहित्य प्रकाशन

अंक ४३, दिनांक ११ सप्टेंबर २००९



**संपादक**

सोनाली घाटपांडे (पुणे)

**आतिथी संपादक**

डॉ. केतकी मोडक (पुणे)

**सह संपादक**

भारती सरमळकर (मुंबई)

स्वप्ना कौल्हे (नाशिक)

अहं ब्रह्मास्मि (पुणे)

सचिन काकडे (मुंबई)

# संपादकीय



।। या देवी सर्व भुतेषु शक्ती रूपेण संस्थिता
नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमो नमः ।।

नवरात्रीची सुरूवात........... देवीच्या आगमनाचा जल्लोश.........
मंगलमय वातावरणात होणारं त्या शक्तीस्वरूपाचं आगमन ..........
ही महादेवी सर्व प्राणीमात्रांमध्ये विविध स्वरूपात निवास करते,
त्यातील एक रूप हे शक्ती स्वरूप !!!

याच शक्ती स्वरूपाचं पूजन या नऊ दिवसात विविध रूपात केलं जातं.
देवीच्या या उत्सवाचं मूळ कारणं देवीचं शक्तीस्वरूपच आहे.
या शक्तीस्वरूपाचा संबंध आहे तो वीरतेशी, जसे देवीने दुर्गारूप धारण करून र्याचे, प्रतापाचे दर्शन घडवले, तसेच या देवीचा अंश अंतरात बाळगणारी प्रत्येक स्त्री वीरतेचे क्षणोक्षणी दर्शन घडवते आहे.

'वामा' म्हणवून जशी स्त्री पतीची वामांगी बनते सौम्य रूपाचे दर्शन घडवते तशीच वेळ पडल्यास ती 'शक्ती मा' किंवा 'शक्ती दुर्गा'बनून दुष्टांचा संहार करायला कचरत नाही.
'नवरात्र' उत्सवात रमणारी, देवीचे पूजन करणारी नारी वेळ पडल्यास 'बंडाचा पुकारा' ही करते.

नवरात्रीचे नऊ दिवस
नऊ रूपांचा साक्षात्कार
नवरात्रीच्या निमित्ताने
नेटाक्षरीचा उपहार



## ..वामा..

जगत जननी,माता,भगिनी
बंध नवे तू जोडीत ये
घेत भरारी क्षितीजाशी त्या
नवे नाते जोडीत ये

अलका,अचला,कोमलगंधा
अभिसारीका झळकत ये
विश्वस्वरुपा,दुर्गा,अंबा
अग्निशलाका तळपत ये

स्नेहसुमना,अधोवदना
कोमल नयना अलगद ये
मौक्तिक मुक्ता,रुप कांचना
सुवर्णलता उमलत ये

चाल हंसिनी,रुप कामिनी
विश्वमोहिनी,सजून ये
गजगामिनी,दिप्ती दामिनी
चंचल हरिणी,बनून ये

रणचंडीका,मुंड मुंडिका
दैत्य दंडिका,जिंकूनी ये
जगतकारिणी,गर्भ धारिणी
दुःख सोषिणी,होऊन ये

रुप गर्विता,तनू अर्पिता
झुळझुळ सरिता,फुलवित ये
लीन ऋजुता,मूक नम्रता
जीव अमृता शिंपीत ये

गीत माधुरी,श्याम बासरी
सूर आसावरी,छेडित ये
शुभ्र मोगरी,कृष्ण मंजिरी
रंग शर्वरी,खुलवित ये

**- प्राजक्ता पटवर्धन (अमेरिका)**

## ..नवरात्र..

घटी बैसे आदिमाया
नंदादीप नऊ दिवस
नवान्नाने तृप्त झाला
झळाळतो अश्विन मास

दाट काजळी अंधार
कृष्णमेघ आले आले
भिजे हस्ताचे नक्षत्र
घट माळ ओले ओले

वृक्ष तरु लता वेली
तृप्त काळोख हिरवा
गारव्याने शहारतो
पानी कंटक बरवा

निवडुंगाचे उंच फडे
एकाकी सुन्न रान
वेळूतून लहरते
शीळ भारी मंद गान

वेळूच्या बनी बाई
सखा कान्हुला राहतो
आकाशी तेज वीज
तेथे राधेला पाहतो

नवराती रातभर
राधा नाचली नाचली
तिच्या अंगोअंगी भिने
घननीळयाची मुरली

**- सई लेले ( ठाणे )**



## ..हे शक्ति मा..

निद्रेच्या घड्या घड्यांमधून
तू झिरपत आलीस
माझ्या अर्धजागृत देहात
चेतना भरलीस
तुझ्या अस्तित्वाच्या संवेदना
अंगाअंगात सळसळू लागल्या
मी सुषुप्तही,मी सजगही
अशी तुला अनुभवत राहिले

अचानक प्रपंचाचे
अड-धड खेळ सुरुही झाले
बेल,दूधवाला,कचरेवालीही
तू आतच दगडाळलीस
तुला कुरवाळायलाही
वेळ नाही माझ्या पाशी

तुला कशी विनवू ?
माझं मीच सोडवायला हवंय
स्वतःला ह्या कर्मपाशांतून

नाही अडकायचंय
ह्या मोहात,ह्या पाशांत
कठीणही नाहीय गं
तुला अनुभवणं
फक्त एक आवाहन
अन स्वर्गा स्वर्गातून
उसळत येतेस

मदत मागतेय
एकच कर
बिढाल न्यायाने
मला उचलून धर
आपल्या मुखांत
अन निघ घेवून गं
आता श्रमलेय मी इथे !

**- प्रभा प्रभुदेसाई ( आसाम )**



## ..शक्तीदुर्गा..

एकटी मी,ना कुणाच्या सोबतीने रांगायचे
धाकटी जरी,वीज मी,संकटांना ना भ्यायचे

बाप बंधू पुत्र नवरा आजवर आधार गं
नीच मी,अबला,अशी आजवर समजूत गं
मनगटातील स्फुल्लिंग माझ्या मी अता चेतायचे
धाकटी जरी,वीज मी,संकटांना ना भ्यायचे

संत सज्जन शिकवुनी गेले मला भक्ती खरी
माय दुर्गा नांदते शक्ती बनूनी अंतरी
रणचंडिका मी शूलधारी म्हैषासुरांना तुडवायचे
धाकटी जरी,वीज मी,संकटांना ना भ्यायचे

मी लता नाही कुणाचा आधारवड शोधायला
विद्युलता मी झळकते,विश्व सारे उजळायला
आज अडविल जर कुणी तर आडवे घालायचे
धाकटी जरी,वीज मी,संकटांना ना भ्यायचे

कोवळी असले तरी ना मुळी अलवार मी
कमनीय बांध्याची अशी दोधारीची तलवार मी
घाव जर पडला कुणावर चिंधड्या ते व्हायचे
धाकटी जरी,वीज मी,संकटांना ना भ्यायचे

आजवर जे सोसले आता नसे मंजूर ते
भय कशाचे एकवटूनी शक्ती सारी झुंजते
बुरशी चढलेल्या विचारांची भुते गाडायचे
धाकटी जरी,वीज मी,संकटांना ना भ्यायचे

**- स्वरांगी देव ( इंदूर )**

## ..बंडाचा पुकारा..

बंद ओठातुनी माझ्या
का ? होतो बंडाचा पुकारा
रणशिंग फुंकताच मी
का ? येतो बडव्यांस शहारा

जळते जरी ज्वलंत मी
सोबती आहे पेटता निखारा
नको देऊस वादळी झंझावात
पुरेसा आहे एक झोतवारा
उडाले छत्र,मोकळी आभाळमाया
या जगाचा पुरेसा,तो एक निवारा
भणंग स्वप्नांस,उभारण्याची आस जणू
घरट्यासाठी मागते मी स्वप्नांचा पिसारा

ओलांडताच कडे मी,त्यांच्या पराक्रमाचे
पाण्यात पाहणारे,करती मग नमुनी मुजरा
पाहूनी कतृत्व,म्हणतील पितृसत्ताक पिढ्या
झाला न गडी तुझ्यासारखा,मैदान मारणारा

**- निशा लाड उर्फ चांदणी ( मुंबई )**

# वीररस काव्यस्पर्धा निकाल

देवी भगवती , देवी दुर्गेची जी मूळ वृत्ती तो वीरभाव..........

सिंहावर आरूढ़ होऊन दैत्यसंहार करणारी दुर्गा, महिशासूर मर्दीनी हे वीररूपाचेच प्रतिक आहे

या आदिमाता दुर्गेच्या पायाशी नवरसरंग स्पर्धेमध्ये विजेत्या ठरलेल्या कवितांची काही वीररसयुक्त

काव्यसुमने !!!

## प्रथम क्रमांक

### दे माते काली खडग तुझे हाती

शत सहस्त्र वर्षे रक्षियले तू माते
उन्मत्त दानवां धाडुनी यमसदनाते
निष्पाप नद्या रूधिराच्या आज वाहाती
दे माते काली खडग तुझे मम हाती

ओलांडूनी सीमा जे अंधा-या राती
मम मायभूमीचे लचके तोडूनी जाती
निर्धार आता चिरणे दैत्यांची छाती
दे माते काली खडग तुझे हाती

ज्या अन्न भरवत्या हाता उलटूनी डसती
पोखरली ज्यांनी भारतभूची माती
निर्वंश अशा करणे सर्पांच्या जाती
दे माते काली खडग तुझे हाती

दे तरूणाहाती तलवारीची पाती
अंगार आता दे, नको दिव्यांच्या वाती
नैवेद्य तुला गे, रिपुमुंडांची आहूती
दे माते काली खडग तुझे हाती

**- सुनील सुळे**

## द्वितीय क्रमांक

### पेटली आग रक्तात

झुंजला मर्द मावळा घेऊनी
समशेर रणी धगधगती
पेटली आग रक्तात उसळली
शिवरायांची भक्ती

पोहचले गडावर राजे... रात्र वै-याची
थांबणे शक्य घटकाभर ... घाई निघण्याची
काळजी इथे कोणास... नसे मरण्याची
शिवशिवत बाहू उडवाया... शिरं मुघलांची

हा मर्द मावळा... गडात किल्लेदार
गडी इमानी... शुर.. वीर.. शिलेदार
गडावर निजले सारे राजांसव सरदार
बैसला मावळा... पहा-यावर तैयार

सरसावुन तलवार तळपती
............ ढाल करुनिया छाती
पेटली आग रक्तात उसळली
शिवरायांची भक्ती

अंधार गर्द शांतता... चोर पाऊले
गडास वेढा... शत्रु सरसावले
जीवास धोका... राजे गडी अडकले
मावळा एकटा... मुघल तीस ठाकले

एकटा नसे तो, असे सोबती... सह्याद्रीचे कडे
डगमगला ना एकही क्षण तो.. उरात वीरश्री चढे
ओढता कपाळी माती, वाजे... उद्धाचे चौघडे
महादेव हर, हर हर गर्जून... तुटूनी मावळा पडे

भक्तासाठी आली धावून
जगदंबेची शक्ती
पेटली आग रक्तात उसळली
शिवरायांची भक्ती

मुघलास वाटले... सहज करू पाडाव
एकटा मावळा... करेल किती मज्जाव
चहुबाजुंनी... मावळयास घेराव
घनघोर लढाई... घावावरती घाव

छातीवर झेलून... मुर्दाडांचे भाले
त्याचे शरीर सारे... जखमांनी रापले
रक्त मराठा... शौर्य जिवंत जाहले
उठलेले ते... हात सर्व कापले

मावळा आठवे... राजांचा प्रताप
बरसला घेऊनी... ज्वालामुखी संताप
दिसे शीर जे... धडावरी ते काप
उडे भितीने... मुघलांचा थरकाप

बावीस छाटले... आता आठच उरले
तलवार तळपली... रणांगणच थरथरले
मावळा गरजला... शौर्याचे वादळ उठले
सारे गलितगात्र... मुघलसैन्य लटपटले

उरले सुरले मुघल पळाले
..............पाहूनी शिवशक्ती
पेटली आग रक्तात उसळली
शिवरायांची भक्ती

- धुंद रवी

# तृतीय क्रमांक

## ज्वलंत

पार कर तयार कर उलटून पुन्हा तू वार कर
चमकेल अपयशी रक्त लेवुनी, हाती ती तलवार धर

मातीतून उसळ असा, आकाशी थरकाप कर
ललाटरेषा पुसून टाक त्या, तूच तुझा उद्धार कर

भेद काळोखा पराजयाच्या, प्रयत्नांचा तू प्रकाश कर
चिरडून टाक, उलथून पाड, अडथळयांचा संहार कर

तूच अर्जुन तुच सारथी गीतेचा परिपाठ कर
बनुनी अभिमन्यू तोड चक्रव्यूह, विजयी तो प्रहार कर

गाठेल जी ध्येयास तुझ्या, वाट अशी निर्माण कर
वेधून घे लक्ष आधी, तिर मग आरपार कर

उपहासणांना मात दे, नजरांचा त्या अर्थ बदल
दुर्लक्षित न व्हावे कधी, अस्तित्व असे निर्माण कर..

**- विनय शिवहरी विरखरे**

# उत्तेजनार्थ



सत्याची करूनी ढ़ाल
तो वीर आगळा लढ़ला
निर्दयी क्रूर सत्तेला
निर्भिडपणे तो भिडला

हातात तयाच्या होते
असहकाराचे शस्त्र
अंगावर चिलखत होते
खादीचे एक वस्त्र

जुलमी गो-यांनी लाख
शरीरावर केले वार
परी आत्म्यावरती त्याच्या
नाहीच चालली धार

तोडूनी कायदे सारे
जिरवे गो-यांची मस्ती
छोटीशी मुंगी जैसी
नमवते माजला हत्ती

तो असा पराक्रमी योध्दा
मानली कधी ना हार
हिंसा न करता त्याने
पळवले शत्रुला पार

असे हे अहिंसक लढ़णे
निधड्या छातीचे काम
बंदुकीनिशी जे लढ़ती
लढ़ण्यात नाही त्या राम

- **अहं ब्रह्मास्मी**

## आम्ही मुंबईकर

गती आमुच्या नसात भिनली
श्वासा - श्वासात
सेकंदाच्या काट्यासंगे
पळतो तालात

कितीक येवो महापूर वा
असंख्य हो विस्फोट
नमणे नाही शमणे नाही
कुठल्या आपत्तीत

अजिंक्य आम्ही रोजच लढतो
नविन संग्राम
आकाशाच्या विराटतेचे
आम्हा वरदान

आम्ही जाणतो सत्य एकची
विश्वची अमुचे घर
आम्हा रोखणे अशक्य केवळ
आम्ही मुंबईकर

थकूनी भागूनी रवी मावळे
रोज सागरात
अन मग हसतो सलाम करतो
सागर आम्हास –
“कुठून मिळते तुम्हास उर्जा, पुरे न सूर्यास
नतमस्तक मी तुम्हापुढे, धुतो पदकमलास !!

**रणजीत पराडकर**

## आतिथी संपादक

## डॉ केतकी मोडक

वीररसाच्या परीक्षक म्हणून डा केतकी मोडक यांनी संमती दिल्याबद्दल आणि परीक्षणाच्या वेळा अत्यंत काटेकोर पणे पाळल्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोत.

डॉ. केतकी मोडक या संत साहित्यावरील एक अधिकारी व्यक्ती म्हणून मान्यवर आहेत. संत साहित्यातील सोहमसाधना या विषयावर संशोधन करून त्यांनी पीएच डी प्रबंध सादर करून डाक्टरेट मिळवली आहे . मात्र त्यानंतरही अभ्यासू वत्तीने या विषयावरील संशोधन चालूच ठेवून आपल्या या महान वारशातून त्यांनी “ कडकडोनी वीज निमाली ठायींचे ठायी” या पुस्तकाचे लेखन केले. या पुस्तकाची दखल सर्व साहित्यिक संस्थांनी घेतली आहे. महाराष्ट्र साहित्य परिषद , महाराष्ट्र तत्त्व न परिषद आदी संस्थांचे अत्यंत मानाचे असे पाच पुरस्कार या पुस्तकाला आजवर लाभले आहेत. डॉ केतकी मोडक गरवारे महाविद्यालयात मराठी विभाग प्रमुख म्हणून कार्यरत आहेत।

## अतिथी संपादकाच्या लेखणीतून ...

वीररस प्रधान कवितांच्या स्पर्धेच्या निमित्ताने डा केतकी मोडक यांनी मांडलेले विचार -

एखाद्या घटनेत, प्रसंगात एखाद्या व्यक्तीने जे असाधारण कर्तृत्व दाखवलेले असते, असाधारण धैर्य दाखवलेले असते त्याचे वर्णन ऐकून वाचून किंवा पाहून आपणही तशीच कृती करावी अशी प्रेरणा मनात निर्माण होते , तेव्हा ते वर्णन वीररसप्रधान आहे असे म्हटाले जाते. म्हणजे वीररसप्रधान कविता असे म्हणताना त्यात पुढील बाबींचा समावेश होतो, वर्णन करायचा विषय वीरतेने ओतप्रोत भरलेला हवा, त्याचे वर्णन वीरश्रीयुक्त हवे, आणि त्यामधून तोच भाव वाचकांच्या मनात संक्रमित करायचे सामर्थ्य हवे म्हणजेच एका वीरश्रीयुक्त कृतीमुळे तीन ठिकाणी तोच भाव प्रतिबिंबित होतो. वर्ण्य विषय, लेखक आणि वाचक.

तेजस्वी, ओजस्वी बाणेदार कृती, तिचे साहित्याच्या माध्यमातून दुस-यापर्यंत संक्रमण, आणि त्यातून पुन्हा तेजस्वी ओजस्वी कृतीची निर्मिती हा प्रवास येथे अपेक्षित असतो. मराठीमध्ये वीररसप्रधान कवितांचे स्वतःचे असे एक आगळे वेगळे महत्व आहे. ‘मर्द मराठा मावळा’ असे शब्द उच्चारताच ते सारे सामर्थ्य, तेज पौरूष आपल्या डोळयांपुढे उभे रहाते एवढा वीरत्वाचा विजयी इतिहास महाराष्ट्राला लाभलेला आहे.

शिवकालानंतर स्वातंत्र्यचळवळीच्या कालखंडातही तीच परंपरा कायम राहिल्याचे आपल्याला दिसते. या दोन्हीही कालखंडांत वीररसप्रधान कविता, साहित्य यांची विपुल प्रमाणात निर्मिती झाली. समाजाला चेतविण्याचे काम अशा प्रकारच्या साहित्याने केले. मराठीतले पोवाडे हा प्रकार तर वीररसालाच वाहिलेला प्रकार!

पुढील काळात मात्र हा वाङमयप्रकार फ़ारसा पुढे आला नाही, आज त्याचे जे तुरळक अस्तित्व दिसते ते इतिहासाशी ईमान राखण्यापुरतेच मर्यादित आहे.

या स्पर्धेच्या निमित्ताने जे विचार स्फुरले ते येथे मांडत आहे. आज वीररसप्रधान साहित्य अभावानेच वाचायला मिळते. याचे कारण काय असावे ? ह्याचा शोध घेण्याची आवश्यकता आहे. परीक्षणार्थ आलेल्या बहुतांशी कविता या शिवकाळावर आधारित आहेत. त्या तशा असायला हरकत नाही. परंतु या निमित्ताने एक भीषण वास्तवच आपल्यासमोर उघडे झाले आहे.

आजच्या कालातील कवींना शाहीरांना वीररसप्रधान साहित्य लिहायचे तर शिवकालाचाच का आधार घ्यावा लागतो ?वर्तमानात अशी काही कृती घडताना दिसत नाही का ? आज आमच्यातील पराक्रम पौरूष लोप पावला का ?

( आज ते काम फ़क्त मोजक्या वीर सैनिकांपुरतेच मर्यादित होताना दिसते) आजूबाजूच्या वास्तवात तो पराक्रम , ते धाडस , स्वतःचे प्राणसुद्धा खर्ची पडले तरी चालतील ही मनाची उभारी, सत्याच्या नीतीच्या मानवतेच्या संरक्षणासाठी दुष्टांचे पारिपत्य करण्याची प्रेरणा कुठे दिसते ? आज वीरश्रीयुक्त कृती घडते, नाही असे नाही पण दुर्जनाविरुद्ध सुजन असा तो मुकाबला नसतो. आज तो सामना अतिदुर्जन विरुद्ध कमी दुर्जन असा बनला आहे. वीरश्रीयुक्त  कृतींगील 'भगवंताचे अधिष्ठान' नाहीसे झाले असल्याने सामान्य माणसाला त्यांच्या कृतीबद्दल ममत्व वाटत नाही. सामान्यांमध्ये तीच वीरश्रीयुक्त भावना संक्रमित होत नाही कारण या कृतीमागील विचारांचे , विशाल ध्येयाचे अधिष्ठानच लोप पावले आहे. आज त्याची जागा संकुचित अशा स्वार्थाने घेतली आहे. समोरच्या व्यक्तीला धूळ चारण्याचे काम आज गुंड, मवाली, दहशतवादी , धर्मांध करतच असतात की, पण आपण त्यांना वीर म्हणत नाही. आणि म्हणून वीरश्रीयुक्त वर्णनासाठी आम्हाला अपरिहार्यपणे शिवकाळाकडे वळावे लागते असे दिसते.

आणि त्याचा परिणाम असा होताना दिसतो , की आज त्या वर्णनाला स्तुती पठनाचे रूप प्राप्त झालेले दिसते. गतकाळातील वीरांची कृती पाहून , त्यातून तशी प्रेरणा निर्माण होण्याचे , आजच्या काळानुरुप वीरश्रीयुक्त कृती करण्याचे , भावनांना आवाहन करण्याचे त्या कवितेचे सामर्थ्य दुबळे पडलेले दिसते. त्यामुळे आज ख-या अर्थाने ज्याला वीररसप्रधान कविता म्हणता येईल अशी कविता आढळत नाही. आज जी कविता दिसते ती वीररसप्रधान कवितेचा आभास आहे असे माझे वैयक्तिक मत आहे. या परीक्षणाच्या निमित्ताने जे विचार मनात आले ते इथे मांडले इतकेच.

परीक्षणार्थ आलेल्या कवितांमधील ख-या अर्थाने वीररसप्रधान कविता मोजक्याच आहेत. काही उत्तम म्हणता येतील अशा कविताही त्यात आहेत, पण त्या कवितांमधील भावना , त्यातील विचार, त्याची भाषा वापरलेले शब्द हे आजच्या काळातील वाटत नाहीत.

चांगल्या कवितांमध्ये सरळ सरळ दोन प्रकार आढळले. एक प्रकार म्हणजे शिवकाळातील मावळ्यांचे , तानाजी, बाजीप्रभू, यांच्या शौर्याचे स्मरण.

एका कवीला महात्मा गांधीचे वीरत्व जाणवले हे विशेष वाटले. रोजच मरणाला निधड्या छातीने  सामोरे जाणाया मुंबईकरांचे वीरपण एकाला जाणवले, हे ही उल्लेखनीय आहे.

दुसरा गट आवाहनपर कवितांचा आहे. मग ते आवाहन कालीमातेला असेल, किंवा षंढपणा सोडून देऊन वीरयुक्त कृती करण्याचे सामान्य व्यक्तीला केलेले आवाहन असेल. अशा कवितांमध्ये वीरतेच्या कृतीचे वर्णन नाही तर वीरश्रीयुक्त कृती करण्यासाठी उद्युक्त व्हावे म्हणून भावनेला केलेले आवाहन आहे.

आयोजकांचा हा उपक्रम निश्चितच स्तुत्य आहे  आपल्या या उपक्रमास माझ्या मनापसून शुभेच्छा. जे स्पर्धक यात सहभागी झाले त्यांच्या प्रयत्नाला नक्कीच दाद द्यावीशी वाटते.

पारितोषिक प्राप्त स्पर्धकांचे अभिनंदन !!

धन्यवाद!

काव्यांजली आणि मराठी कविता तुमच्यासाठी घेऊन येत आहेत

=====================================

नवरस काव्यस्पर्धा मालिका

=====================================

यात आहेत साहित्यातील नऊ रस प्रत्येक स्पर्धा एका रसावरील कवितांची
नऊ रस नऊ स्पर्धा एक महा मालिकाच म्हणा ना !!!
दर महिन्याला एक रस तब्बल नऊ महिने चालणारे ही धम्माल !!!

काव्यस्पर्धेचा उद्देश 'चढाओढ़' हा नाही,
कोणी छोटे - मोठे, कविता चांगली वाईट सिध्द करण हा ही नाही .
ही स्पर्धा आपल्या प्रतिभेला आव्हान आहे , सृजनशक्तीला आवाहन आहे.
निवड्क कविता नेटाक्षरीमध्ये प्रसिध्द होतील. हजारोंपर्यंत जातील. बक्षिसेही असतीलच.
लिहा मंडळी ! बघुया महाराष्ट्राच्या उद्याच्या 'लेखण्या' काय आहेत ते.

=====================================

या महिन्याचा **'रस'**विषय **'भक्तीरस'**

=====================================

तुमच्या १/२ **'भक्तीरस'**पूर्ण कविता आम्हाला १५ सप्टेंबर २००९ पर्यंत
**marathikavitamarathispardha@gmail.com**
वर पाठवा.

सोबत आपल्या ओरकूट प्रोफाईलची व ब्लॉगची लिंक नक्की पाठवा..
अधिक माहिती कम्युनिटीवर मिळेल.

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ४०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

**netaksharee@gmail.com**